**नोंदणी व मुद्रांक विभागातील अतिरिक्त सवंर्ग कक्षामधून सह जिल्हा निबंधक वर्ग-२/सह दुय्यम निबंधक वर्ग-२ या संवर्गात समावेशनाने नियुक्त अधिकाऱ्यांना सुधारित आश्वासित प्रगती योजनेचा दुसरा लाभ मंजूर करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : आस्थाप-२०१७/१९२०/प्र.क्र.४००/म-१ (धोरण)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार इमारत), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०२ मार्च, २०२३.

**संदर्भ:** १) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महा.राज्य,पुणे यांचे पत्र क्र.का.९/आस्था-४/वर्ग-२ आश्वासित/३०३४/२१, दि.३०.१२.२०२१

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:-वेतन-१९९९/प्र.क्र.२/९९/सेवा-३, दि.२०.०७.२००१

३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९(भाग-४)/२००४/वित्तीय सुधारणा-१,दि.२६.३.२००४

४) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.वेतन-१९०९/प्र.क्र.४४/सेवा-३,दि.०१.०४.२०१०

**प्रस्तावना: -**

नोंदणी व मुद्रांक विभागातील सह दुय्यम निबंधक, वर्ग-२ संवर्गाची पदे तातडीने भरण्याची गरज विचारात घेवून, पाटबंधारे विभागातील सहाय्यक अभियंता, वर्ग-२ या संवर्गातील तसेच इतर विभागामध्ये अतिरिक्त ठरलेल्या संवर्गातील एकूण ४७ अधिका-यांना या विभागाच्या शासन निर्णय, क्र. आस्थापना-२००५/५२४/प्र.क्र.९७/म-१, दि.०९.५.२००६ अन्वये सह दुय्यम निबंधक, वर्ग-२ या संवर्गात समायोजित करण्यात आले होते.

सदर अधिका-यांपैकी ३० अधिकारी यापूर्वी सहाय्यक अभियंता, वर्ग-२ या पदावर कार्यरत असताना जलसंपदा विभागाच्या दि.१५.०३.२००१ रोजीच्या आदेशान्वये आश्वासित प्रगती योजनेचा पहिला लाभ देण्यात आला आहे. आश्वासित प्रगती योजनेचा पहिला लाभ मिळाल्याच्या वेळी ३० अधिकारी रु.६५००-२००-१०५०० या वेतनश्रेणीत कार्यरत होते. त्यामुळे सदर ३० अधिकाऱ्यांना ते ज्या विभागात कार्यरत होते, त्या कार्यालयात त्यांना रु. ८०००-२७५-१३५०० ही वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली. सदर ३० अधिकाऱ्यांचे समायोजन सहाय्यक अभियंता, वर्ग-२ या पदावरुन नोंदणी व मुद्रांक विभागातील सह दुय्यम निबंधक, वर्ग-२ या पदावर करण्यात आले आहे. सह दुय्यम निबंधक, वर्ग-२ या पदाची सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रु. ९३००-३४८००, ग्रेड पे ४४०० अशी आहे. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक असंक-१००१/प्र.क्र.२९/(भाग-४)२००४/वित्तीय सुधारणा, दिनांक २६.३.२००४ मधील १६ (ड) व (इ) च्या तरतुदीनुसार सदरचे अधिकारी आश्वासित प्रगती योजनेंतर्गत उच्च वेतनश्रेणी धारण करीत असल्यास, सदर वेतनश्रेणी संरक्षित करण्यात यावी, अशी तरतूद असल्याने उपरोक्त अधिकाऱ्यांना त्यांच्या समायोजनापूर्वीच्या मुळ विभागातील पुढील उप कार्यकारी अभियंता या पदाची वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे ५४०० संरक्षित करण्यात आली आहे. प्रस्तुत अधिकाऱ्यांना रु. १५६००-३९१००, ग्रेड पे ५४००/- ही वेतनश्रेणी संरक्षित करण्यात येऊन त्यांच्या नावाचा सह जिल्हा निबंधक, वर्ग-२ या संवर्गाच्या ज्येष्ठता यादीमध्ये समावेश करण्यात आलेला आहे. सदर ३० अधिकाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेचा लाभ द्यावयाचा झाल्यास वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १/७/२०११ मधील स्पष्टीकरण क्र.१२ मध्ये नमूद केल्यानुसार कर्मचारी अतिरिक्त ठरुन साखळी विचारात घेण्यात यावी, अशी तरतूद आहे. सदर तरतुदीनूसार प्रस्तुत अधिकाऱ्यांना मुद्रांक विभागातील सह जिल्हा निबंधक वर्ग-१, निम्न श्रेणी या पदाची वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० ग्रेड पे रु.५४०० चा लाभ होईल. तथापि, सदर अधिकाऱ्यांना समायोजनानंतर अद्यापपर्यन्त एकही पदोन्नती मिळालेली नाही.

वित्त विभाग,शासन निर्णय दिनांक १ एप्रिल २०१० अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सुधारित सेवांतर्गत योजनेअंतर्गत १२ व २४ वर्षाच्या नियमित सेवेतनंतर पहिला व दुसरा लाभ अनुज्ञेय करण्याची

तरतूद आहे. सदर योजनेअंतर्गत नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्याकडून संदर्भ क्र.१ अन्वये प्राप्त नोंदणी व मुद्रांक विभागात अतिरिक्त संवर्ग कक्षामधून सह जिल्हा निबंधक वर्ग-२/ सह दुय्यम निबंधक वर्ग-२ यासंवर्गात समावेशनाने नियुक्त अधिकाऱ्यांना सुधारित आश्वासित प्रगती योजनेचा दुसरा लाभ मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन आदेश :-</u>**

वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल,२०१० च्या शासन निर्णयान्वये नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक विभागातील अधिका-यांना १२ व २४ वर्षाच्या नियमित सेवेनंतर पहिला, दुसरा लाभ अनुज्ञेय करण्याची तरतूद आहे. सदर तरतूदीनुसार नोंदणी व मुद्रांक विभागातील समावेशनाने नियुक्त अधिकाऱ्यांना (गट §ब वेतन श्रेणी ९३००-३४८०० ग्रेड पे ४४००) या पदावर सलग १२ वर्षाची नियमित सेवा पूर्ण झालेल्या खालील २८ अधिका-यांना आश्वासित प्रगती योजनेचा दुसरा लाभ त्यांच्या संरक्षित केलेल्या वेतनश्रेणी (रु.१५६००-३९१००, ग्रेड पे ५४००) या वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देवून दुसरा लाभ मंजूर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम- सह दुय्यम निबंधक वर्ग-२ | नोंदणी विभागात प्रथम नियुक्तीचा दिनांक | आ.प्र. योजनेंतर्गत पहिला लाभ मंजूरीची वेतनश्रेणी | आ.प्र. योजनेंतर्गत दुसरा लाभ मंजूरीचा दिनांक | आ.प्र.योजनेंतर्गत दुसरा लाभ मंजूरीची वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००, ग्रेड पे ५४०० |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २० | एस. यु. समदाडीया | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २ | २२ | ए. पी. हांडा | ०६/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| ३ | २३ | के. एन. भामरे | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| ४ | २४ | पी.डी. आहिरे | ०३/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| ५ | २५ | डी. पी. देशपांडे | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| ६ | २६ | के. आर. थोरात | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| ७ | २७ | पी. जी. वायकोळे | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| ८ | २८ | एस. एल तांबे | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| ९ | स्वे.से.नि | के.जे. मचे | ०३/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| १० | २९ | एन. जी. पैठणकर | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| ११ | ३० | बी. एस. लुटे | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| १२ | ५४ | वाय. एन. सोनावणे | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| १३ | ५५ | एम.एस. कदम | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १४ | ५६ | एस. पी. थूलकर | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| १५ | ५७ | ए.एस. सवाईमुल | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| १६ | ५८ | बी.ए. गुंजाळ | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| १७ | ५९ | यु. एम. सरपटवार | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| १८ | ६० | एम. जी. देशमुख | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| १९ | ६१ | व्ही. आर. दिघे | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २० | ६२ | एल. बी. शेळके | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २१ | स्व.से.नि | व्ही. पी. वानखेडे | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २२ | ६३ | ए. एस.पाटील | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २३ | ६४ | बी. बी.चेवले | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २४ | ६५ | व्ही. जी. रघुवंशी | २१/०५/२००७ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २५ | ७५ | व्ही.एस.कोतकर | ०३/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २६ | ७६ | एस. ओ. नारखेडे | २३/०७/२००९ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २७ | ७९ | व्ही.पी. सुरवसे | ०३/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |
| २८ | ८१ | डी. एम. घाणे | ०४/०७/२००६ | ०१/०८/२००१ | ०१/०८/२०१३ | संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ देण्यात यावी. |

सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या लाभामुळे संबंधित अधिका-यांच्या जबाबदारीत आणि कर्तव्यामध्ये वाढ होत नसली तरी त्यांना वित्त विभाग, शासन निर्णय दि. ०१.०४.२०१० मधील तरतुदीच्या अधीन राहून वेतन संरचनेत वेतन निश्चितीचा लाभ मिळेल.

**०२.** या आदेशान्वये कालबध्द पदोन्नती / सेवातर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी वित्त विभाग शासन अधिसूचना, क्रमांक वेपूर १२०६/प्र.क्र.२७/सेवा-९,दि.२२.४.२००९ व शासन अधिसूचना क्रमांक:-वेपुर १२०९/सुधारणा-३/प्र.क्र.१३७/सेवा-९, दि. २२/०८/२००९ व वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पीएवाय-१०८२/सीआर-११००/(एक)एसईआर-३, दि.६/११/१९८४ नुसार वेतन निश्चितीचा विकल्प द्यावयाचा असल्यास तो त्यांनी हे आदेश निर्गमित झालेल्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत देण्यात यावा.

**०३.** जलसंपदा विभागातील वरील अधिकारी अतिरिक्त ठरल्यामुळे समावेशनाने नोंदणी व मुद्रांक विभागात रुजू झालेले आहेत. सदर अधिकाऱ्यांचे रू.१५६००-३९१००,ग्रेड पे ५४००/- या वेतनश्रेणीत वेतन संरक्षित झाले असल्याने त्यांना पदोन्नतीच्या साखळीतील वरच्या पदाची वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० ग्रेड पे ५०००/- या

वेतनश्रेणीत वेतन न देता महाराष्ट्र नागरी सेवा नियम,१९८१ मधील नियम ११(१) नुसार त्यांना रु.१५६००-३९१००,ग्रेड पे ५४०० या संरक्षित वेतनश्रेणीतच एक वेतनवाढ मिळवून वेतननिश्चिती करण्यात यावी.

**०४.** सदर शासन आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौ./संदर्भ क्रमांक २५६/२२/सेवा-३, दि.२१/०६/२०२२ अन्वये दिलेल्या अभिप्रायाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०३०२१७२२३३३९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=1085617af371f507cb8ee4d914eb645d92480247b61bd58b5c3074ba3a6a62d7, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2023.03.02 17:26:24 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
३. महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
४. महालेखापाल, १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
५. संबंधित अधिकारी(नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे) यांचेमार्फत.
६. अधिदान व लेखा अधिकारी,
७. निवडनस्ती म-१(धोरण), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.